संजय गांधी निराधार अनुदान योजनेखाली निराधार आणि शारिरीकदृष्टया अपंग असणा-या व्यक्तींना देण्यात येण-या आर्थिक मदतीत केलेली वाढ

महाराष्ट्र शासन
गृहनिर्माण व विशेष सहाय विभाग
शुध्दीपत्रक क्र. संगायो/ १०९९/ प्र.क्र. १३४/ विस १
मंत्रालय, मुंबई 32.
दिनांक ८ फेब्रुवारी २०००

पहा : शासन निर्णय क्र. संगायो/१०९९/ प्र.क्र. १३४/ विस १ दिनांक २९ डिसेंबर १९९९.

शुध्दीपत्रक -

संजय गांधी निराधार योजनेंतर्गत देण्यात येण-या मासिक अनुदानात वाढ करुन ते रु. १००/- ऐवजी रु. २५०/- इतके करावे व सदर वाढीव अनुदान दिनांक १.१.२००० पासून लागू करावे असे मंत्रिमंडळाने निर्णय घेतला आहे. तदनुषंगाने शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

जर एखाद्या कुटुंबात दोन पेक्षा अधिक निराश्रीत किंवा शारिरीकदृष्टया अपंग व्यक्ती असतील तर त्या कुटुंबास जास्तीत जास्त किती मदत द्यावयाची ही बाब शासनाच्या विचाराधीन होती. आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

निर्णय :

या योजनेनुसार प्रत्येक व्यक्तीस दर महिन्यास दिनांक १.१.२००० पासून २५० रुपयांची आर्थिक मदत मिळेल. मात्र असे की जर एखाद्या कुटुंबात दोन लाभार्थी असतील तर रु. ५००/- व दोन पेक्षा अधिक लाभार्थी असतील तर जास्तीत जास्त रु. ६२५/- इतकी मदत देण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

विजय नाहटा
उप सचिव, महाराष्ट्र शासन

GR-20020930122304000-1500